राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत (जल जीवन मिशन) सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.....
सहाय्यीकृत बाबी, पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (लेखाशीर्ष २२१५ ९९८९)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निवित-२०२०/प्र.क्र.२४/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ४ फेब्रुवारी,२०२०

वाचा-

१) अवर सचिव, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र.क्र. W-11020/197/2015 दि.२५ नोव्हेंबर,२०१९
२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे पत्र क्र. पावस्वससं/वासो-८ / प्र.क्र.०६/बँ.खा/२०१९/५४, दि.१६ जानेवारी,२०२०
३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे पत्र क्र. पा.व.स्व.स.सं/पागुशा ००१९/ प्र.क्र.०१/२०२०/५३ दि.१७ जानेवारी,२०२०

प्रस्तावना-

जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने संदर्भिय क्र.१ च्या पत्रान्वये राज्यास निधी उपलब्ध करुन दिला आहे. उक्त कार्यक्रमांतर्गत सदर निधीच्या ५ % निधी सहाय्यीकृत बाबींकरीता तर २% निधी पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणाकरीता उपयोगात आणण्यास केंद्र शासनाच्या संदर्भिय पत्रान्वये अनुमती देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने सहाय्यीकृत बाबी आणि पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) या घटकाकरीता केंद्र हिश्श्यांतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याची संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी संदर्भिय पत्रान्वये विनंती केली आहे. यास्तव पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांना सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरीता २२१५ ९९८९ या लेखाशीर्षाखाली केंद्र हिस्सा उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून सहाय्यीकृत बाबी (Support) व पाणी व गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) या घटकासाठी प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानाच्या प्रमाणानुसार (केंद्र ६०: राज्य ४०) सहाय्यीकृत बाबी (Support) व पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) या घटकासाठी केंद्र हिश्श्यांतर्गत आर्थिक वर्ष २०१९-२०२० मध्ये मागणी क्र. वाय-०२, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (३०) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९९८९) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी रु.७२ कोटी राज्याच्या एकत्रित निधीत जमा आहेत. सदर निधीपैकी ५ टक्के सहाय्यीकृत बाबी व २ टक्के पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणाकरीता म्हणून अनुक्रमे रु.१७,२६,३८,५००/- व रु.६,९०,५५,४००/- असे एकुण रु.२४.१६९३९ ( अक्षरी-चोवीस कोटी सोळा लक्ष त्र्यण्णव हजार नऊशे फक्त) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांना खालील अटींच्या अधिन राहून मंजूर व मूक्त करण्यात येत आहेत.

१) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांनी या अनुदानातुन केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व जल जीवन मिशन या कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई/ नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यास लेखा परिक्षणाकरीता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखपाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

२) ग्राम विकास विभागाचे शासन परिपत्रक क्र.आरसीएन-१०८९/सीआर-३०२७/२८, दि.०५ सप्टेंबर,१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नेंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना पाणी पुरवठा व स्वच्छता संस्था, बेलापूर यांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन पापु-०५ व पापु -२० यांना सादर करावे.

३) यामंजूर अनुदानाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत

४) राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS या योजना प्रणालीवर नोंद घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात

५) सर्वसाधारण घटकांतर्गत उपलब्ध करुन दिलेला निधी अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा

६) सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

२. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत लेखाशीर्ष २२१५ ९९८९ या खाली राज्य शासनाकडून प्राप्त सहाय्यीकृत बाबी (Support) या घटकासाठीचा रु. २४.१६९३९ कोटी ( अक्षरी- चोवीस कोटी सोळा लक्ष त्र्यण्णव हजार नऊशे फक्त) एवढी रक्कम आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी अवर सचिव (रोखशाखा) (श्री.पां.रा.खोटरे) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (श्री.रा.म.गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम (श्री.पां.रा.खोटरे) आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या जल जीवन मिशनच्या बँक खात्यात जमा करावी व तद्नंतर स्वतंत्र धनादेशाद्वारे रक्कम पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी. पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर रक्कम केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार तसेच राज्य शासनाने या संदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावी.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र.वाय-०२, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०३०) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९९८९) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ८ व क्र. ९मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०११५३४०२१०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.02.04 14:07:19 +05'30'

**वसंत माने**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई
४. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
६. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
८. निवडनस्ती कार्यासन पापु-१०